**Convertion in Regular Temparary Establishment:-Shri.Pandharinath C. Kale,working under Superintending Engineer &Administratar, CADA, Nashik.**

**कार्यव्ययी व रोजंदारी आस्थापनेवरील पदाचे अस्थायी आस्थापनेवरील पदामध्ये रुपांतरण अधिक्षक अभियंता व प्रशासक,लाभक्षेत्र विकास प्राधिकरण,नाशिक-श्री.पंढरीनाथ चि.काळे, मजूर**

**महाराष्ट्र शासन**

जलसंपदा विभाग,

शासन निर्णय क्रमांक : रुअआ-२०११/(६४/११)/आ (कामगार )

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

दिनांकः- १६/०९/२०११

पहावे:- १) शासन निर्णय, पाटबंधारे विभाग, इएसडब्ल्यू-१०९२/१५०५/९६/९२/आ(कामगार) दिनांक-३१.०३.१९९२.

२) शासन निर्णय, सार्वजनिक बांधकाम विभाग, क्रः- रु.अ.आ- १५९६/२२८/ सेवा- ५, दिनांक २४.४.२००१.

३) अधिक्षक अभियंता व प्रशासक,लाभक्षेत्र विकास प्राधिकरण,नाशिकयांचे पत्र क्रः- लाक्षेविप्रा/आ.३५७०९/२०११, दिनांक-२८.०६.२०११.

**प्रस्तावना** :-

पालखेड पाटबंधारे विभाग, नाशिक येथे श्री पंढरीनाथ चिंधू काळे, मजूर हे दिनांक ०१.०७.१९७६ पासून दिनांक ३१.०३.१९८० पर्यंत मुकादम / पाटकरी या वेगवेगळया पदांवर कार्यव्ययी आस्थापनेवर कार्यरत होते. त्यांना वरील क्र -१ येथील शासन निर्णयान्वये मजूर पदी रूपांतरीत अस्थायी आस्थापनेवर घेण्यात आले. श्री. काळे यांनी त्यांना पाटकरी पदावर घेण्याकरीता मा. कामगार न्यायालय, नाशिक येथे दावा क्र ५०/८८ दाखल केला. सदर दाव्यामध्ये श्री.काळे यांना दिनांक ०१.०५.१९८० पासून सेवाखंडासह वेतन व भत्त्याचा फरक देण्यात यावा असा निर्णय देण्यात आला. मा. कामगार न्यायालयाच्या सदर निर्णयाविरूध्द शासनामार्फत मा उच्च न्यायालयात दावा क्र २२८७/९७ दाखल करण्यात आला. सदर दाव्याचा निकाल दिनांक-०७.०१.२०१० रोजी शासनाच्या विरोधात लागला. सदर निकालानुसार मा. उच्च न्यायालयाने श्री. काळे यांना दिनांक-०१.०७.१९८१ पासून पाटकरी पदावर घेऊन त्यांना कालेलकर करारानुसार कायमपणाचे फायदे देण्याबाबत निर्णय दिला. त्यानंतर शासनाचे पत्र क्र- न्यायप्र / संक/ ९७०(२१७/१०), आ (अतांत्रिक) दिनांक ०७.०७.२०१० अन्वये मा.उच्च न्यायालयाच्या निर्णयाविरुध्द मा सर्वोच्च न्यायालयात एसएलपी दाखल करण्यात आले. परंतु सदर एसएलपी विलंबाच्या कारणास्तव आणि गुणवत्तेच्या आधारे दिनांक-२९.१०.२०१० रोजी फेटाळण्यात आले. मा सर्वोच्च न्यायालयाच्या सदर निकालाविरुध्द रिव्हयू पिटिशन दाखल करुन काहिही फलनिष्पत्ती होणार नाही, असे ॲड.श्री.संजय खर्डे, सरकारी वकील,नवी दिल्ली, हयांनी अभिप्राय दिलेले आहेत. त्यानुसार श्री.काळे यांना मजूर पदाऐवजी पाटकरी पदावर रूपांतरीत अस्थायी आस्थापनेवर घेण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. याबाबत पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे

**शासन निर्णयः-**

अधिक्षक अभियंता व प्रशासक,लाभक्षेत्र विकास प्राधिकरण,नाशिक अंतर्गत श्री पंढरीनाथ चिंधू काळे, यांना मजूर पदावर रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर घेण्याबाबतचा क्र इएसडब्ल्यू-१०९२/१५०५/९६/९२/आ(कामगार),

कृ.मा.प.

दिनांक-३१.०३.१९९२ चा शासन निर्णय श्री.काळे यांच्यापुरता अधिक्रमित करुन श्री.काळे यांना त्यांच्या नावांसमोर दर्शविल्याप्रमाणे त्यांनी धारण केलेले तत्सम पद खालीलप्रमाणे अस्थायी आस्थापनेवर रुपांतरीत करण्यात येत आहे.

| अ क्र. | कर्मचा-याचे नांव | आस्थापनेचा प्रकार | प्रथम नियुक्तीचा दिनांक | रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर आणावयाचा दिनांक | रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर घ्यावयाचे पद | वेतनश्रेणी |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | श्री.पंढरीनाथ चिंधू काळे, | मजूर | ०१/०७/१९७६ | ०१/०७/१९८१ | पाटकरी | रु. ७७५-११५० (जुनी) रु. २६१०-४००० (५ वा वेतन आयोग ) |

३. श्री.पंढरीनाथ चिंधू काळे, यांना रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर आणल्यामुळे त्यांना पुढील सवलती देण्यात येत आहेत :-

अ) अस्थायी आस्थापनेवर रुपांतरीत केलेल्या पदाकरीता सेवाप्रवेश नियमानुसार वा अन्य प्रकारे विहित करण्यात आलेली किमान / कमाल वयोमर्यादेची व चतुर्थश्रेणी कर्मचा-यांच्या बाबतीत शैक्षणिक अर्हतेची अट शिथिल करण्यात येत आहे.

ब) नेमणूक सेवायोजन कार्यालयाच्या शिफारशीव्यतिरिक्त अन्य मार्गाने झालेली असल्यास, सेवायोजन कार्यालयामार्फत भरती करण्याची अट शिथिल करण्यात येत आहे.

क) स्वास्थ्य प्रमाणपत्र सादर करण्याच्या अटीतून त्यांना सूट देण्यात येत आहे.

४. अधिक्षक अभियंता व प्रशासक,लाभक्षेत्र विकास प्राधिकरण,नाशिक,यांनी या आदेशातील सर्व अटी व शर्ती विचारात घेऊन कोणत्याही त्रुटी राहणार नाहीत, याची दक्षता घ्यावी आणि योग्य ते सविस्तर आदेश या शासन निर्णयाच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत निर्गमित करून ते संबंधित कर्मचा-याच्या निदर्शनास आणावेत. तपशीलामध्ये संबंधित कर्मचा-यांचे नांव, पदनाम, त्यांच्या प्रथम नियुक्तीचा दिनांक किंवा त्याला रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर ज्या दिनांकापासून आणण्यात आले आहे, तो दिनांक,इत्यादी बाबी नमूद कराव्यात.त्यामध्ये कोणतीही चूक अथवा त्रुटी आढळून आल्यास क्षेत्रिय अधिका-याने अशी बाब तात्काळ शासनाच्या निदर्शनास आणावी. क्षेत्रिय अधिका-याने सदर आदेशात स्वतःच्या अधिकारात कोणतेही फेरबदल करू नयेत, तसेच हे आदेश संबंधित कर्मचा-यांच्या व्यक्तिशः निदर्शनास आणून शासनाने निर्गमित केलेल्या आदेशाच्या बाबतीत संबंधित कर्मचा-याची (नांव, पदनाम, त्यांच्या प्रथम नियुक्तीचा दिनांक किंवा त्याला रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर आणण्याचा दिनांकात दुरूस्ती इत्यादी बाबी) कोणतीही तक्रार नसल्यास त्यांच्याकडून तशा आशयाचे प्रपत्र "ब"मधील दिलेल्या नमुन्यात हमीपत्र (Undertaking )घेऊन ते त्या कर्मचा-याच्या सेवापटात / सेवापुस्तकात चिकटवून ठेवावे आणि ही सर्व कार्यवाही पूर्ण केल्याचा अनुपालन अहवाल या आदेशाच्या दिनांकापासून तीन महिन्यांच्या आत शासनाला सादर केला जाईल, याबाबत संबंधित अधीक्षक अभियंत्यानी सतर्क रहावे. या आदेशामध्ये काही तफावत / त्रुटी असल्याची संबंधित कर्मचा-याची तक्रार असल्यास अशी तक्रार त्यांच्याकडून लेखी स्वरूपात घेण्यात यावी आणि आपल्या कार्यालयाच्या अभिप्रायासहित दुरूस्तीचा प्रस्ताव या आदेशाच्या दिनांकापासून तीन महिन्यांच्या आत शासनास सादर केला जाईल याची दक्षता घ्यावी. दुरूस्ती प्रस्ताव पाठविताना संबंधित कर्मचा-याच्या नेमणूकांच्या आदेशांच्या प्रती, नाममात्र हजेरीपटाच्या प्रती आणि सेवापट पाठविण्याची दक्षता घ्यावी.

५.		श्री.पंढरीनाथ चिंधू काळे, यांची वेतननिश्चिती त्यांना रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर घेतल्याच्या दिनांकापासून करण्यात यावी. श्री.काळे यांना दिनांक ०१.०७.१९८१ ते दिनांक ३१.०३.२०११ पर्यंतची वेतन फरकाची थकबाकी अनुज्ञेय राहिल.

६.		या आदेशान्वये रूपांतरीत करण्यात आलेल्या कर्मचा-यांच्या वेतनापोटी होणारा खर्च सन २०११ ते २०१२ या आर्थिक वर्षात संबंधित लेखाशीर्षाखालील मंजूर अनूदानातून भागविण्यात यावा.

७.		हे आदेश शासन निर्णय, सार्वजनिक बांधकाम विभाग, क्र. रूअआ- १५९६/२२८/सेवा -५, दिनांक २४.०४.२००१ अन्वये मंत्रालयीन प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारांचा वापर करून काढण्यात येत आहे.

८.		हा शासन निर्णय www.maharastra.gov.in हया संकेत स्थळावर २०११०९१६१२२३३४००१ हया सांकेतांक क्रमांकावर प्रसिध्द करण्यात आला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने.

**( अ.अ.कोदे )**
**शासनाचे उप सचिव**

प्रत सहपत्रासहित अग्रेषित :-
महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र -१, मुंबई/ महाराष्ट्र -२ नागपूर
महालेखापाल, लेखा परीक्षा, महाराष्ट्र -१, मुंबई/ महाराष्ट्र -२ नागपूर
जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक,
वित्त विभाग, (व्यय-१२), मंत्रालय, मुंबई-४०००३२.
अधिक्षक अभियंता व प्रशासक,लाभक्षेत्र विकास प्राधिकरण,नाशिक
कार्यकारी अभियंता, पालखेड पाटबंधारे विभाग ,नाशिक
निवडनस्ती /आस्थापना (कामगार ) संग्रहार्थ